# ध्वनिमुद्रणातील दीपस्तंभ : माधवराव माडगावकर

**नमस्कार,**
कांही वर्षांपूर्वी मुंबईला गेलो होतो तेव्हा, शिवाजी पार्कचा माझा संग्राहक मित्र मुकुंद आचार्यने मला निरोप दिला की, *"अरे जयु, माडगावकर तुझी आठवण काढीत होते. त्यांनी तुला घरी* भेटायला बोलावलंय. तू सांगितल्याप्रमाणे त्यांनी त्यांच्या कांही आठवणी लिहून काढल्या आहेत." अर्थात, ही आनंदाची बातमी होती. मी लगेच माधवरावांना फोन करून त्यांना भेटायला गेलो होतो. त्यावेळी ते म्हणाले, *"जयंत, आठवणी जशा आठवल्या तशा लिहून काढल्या आहेत. माझ्यासोबतचा लताबाईंचा हा दुर्मिळ फोटो मिळाला तो या लेखाबरोबर प्रकशित करणार आहे. आठवणी जरा वाचून बघ. तुझ्यामुळे हे शक्य झालं आहे."* त्या वाचल्यावर मी माधवरावांना म्हटलं, *"एच. एम. व्ही.च्या स्वरगंगेतील या पवित्र, दुर्मिळ व दुर्लभ आठवणी आहेत. रसिक वाचकांना निश्चित मनापासून भावतील व त्याचं उत्तम स्वागत होईल."*

*यातील सर्व दुर्मिळ छायाचित्रें अजय माडगावकरच्या सौजन्याने...*



***१-३) माधवराव माडगावकर मुंबईतील HMV स्टडीओत, ध्वनिमुद्रणाच्या खोलीत... २) जी. एन. जोशी व माधवराव माडगावकर...***

माधवरावांचा मुलगा अजय हा माझा बालमोहन शाळेतील मित्र. आम्ही एकत्र क्रिकेट खेळात होतो. अजय हा सुद्धा दिसायला आई-वडिलांसारखा सुंदर, उंच व शिवाजीपार्कला लोकप्रिय होता. तसेच, अभ्यासात अतिशय हुशार होता. शिवाय त्याचा मित्रपरिवारही अफाट होता. परंतु, मला दुर्मिळ गाण्यांचा छंद व आवड असल्याने मी अजयच्या आई-वडिलांशी अधिक मैत्री करून होतो. माडगावकरांच्या घरात पूर्वीपासून खेळाचं अंग होतं. कारण, माधवरावांचे बंधू विजय माडगावकर हे

१९३४ मधील भारतामधील पहिले राष्ट्रीय बॅडमिंटन चॅम्पियन होते. तसेच, त्यांचा मुलगाही बॅडमिंटन चॅम्पियन होता. मला आठवतंय मी नोकरीला लागलो तेव्हा ज्या बसमधून प्रवास करीत होतो त्याच बसमध्ये अजयचे वडीलही सोबतीला असत. ते अत्यंत विनम्र व शांत स्वभावाचे होते. तसेच उंचपुरे, मितभाषी आणि त्यांचं व्यक्तित्व रुबाबदार होतं. त्यावेळी ते जगप्रसिद्ध HMV कंपनीत चीफ रेकॉर्डिंग इंजिनियर म्हणून काम करीत होते. कांही कारणास्तव अजयचा व माझा रेकॉर्डिंग निमित्ताने वैयक्तिकदृष्ट्या अधूनमधून संपर्क होत असे. त्यामुळे तत्सबंधित मला अधिक माहिती मिळत असे. शिवाय, क्रिकेट हा आमच्यातला सर्वसामान्य दुवा होताच. याआधी अजयच्या आई-वडिलांना माझा छांदिष्ट स्वभाव व संग्राहक वृत्तीची कल्पना होती. मला ठवतंय लग्नापूर्वी सुधा सबनीस या नांवाने गोड गळ्याची  अजयची आई ही भावगीत गायिका म्हणून प्रसिद्ध होती. अनेक नामवंत संगीतकारांकडे त्यांनी गायन केलं होतं व त्यांच्या रेकॉर्डस् खूप लोकप्रिय होत्या. शिवाय, मुंबई आकाशवाणीवरही त्या नियमित गात असत. म्हणतात की, संगीतकार श्रीनिवास खळे यांच्या संगीत रचना या गायक गायिका यांना गाण्यासाठी अवघड असत, त्यामुळे खळे यांच्या कडे गाणे म्हणजे कठीण परीक्षा पास होणे असे मानले जात असे. सुधाताईंच्या कांही रेकॉर्डस् श्रीनिवास खळे यांनीही स्वरबद्ध केल्या होत्या. असो. पुढे अजय व मीही अमेरिकेत आलो. निवृत्तीनंतर अजयचे आई-वडीलही मुंबईला राम-राम करून अजयकडे ह्यूस्टन, टेक्सासला कायमचे रहायला आले होते.

माझं भाग्य असं की, मी कधी अजयला त्यांच्या चौकशीसाठी फोन केला की, अजयची आई माझ्याशी खुप गप्पा मारीत असे. अर्थात, सुवर्णकाळातील जुन्या आठवणीत त्या मला घेऊन जात





***१) अजयचे आई-वडिल. ह्यूस्टन, टेक्सासला अजयच्या घरी झालेल्या भेटीत... २) HMV स्टुडीओत भावगीत गातांना अजयच्या आई (पूर्वीच्या सुधा सबनीस) व वायोलिनवर व्ही. जी. जोग... ३) व्ही. जी. जोग, सुधाताई व माधवराव...***

असत. आणि मला ती मेजवानी असे. अजयच्या आग्रहास्तव एक दिवस मी निश्चय केला की,

आपण अजयकडे टेक्सासला त्याला व त्याच्या आई-वडिलांना भेटायला जायचं. त्याप्रमाणे मी गेलो होतो. मात्र जातांना अनेक प्रश्न माझ्या डोळ्यासमोर होते. त्यांची भेट ही मला सुवर्णसंधी होती. आणि त्या तयारीने मी गेलो होतो. आमचा दुर्मिळ गाण्यांचा खजिना आम्ही पुण्याला दान करण्याच्या तयारीत होतो. त्यामध्ये सुधाताईंची एक अत्यंत लोकप्रिय रेकॉर्ड माझ्याकडे होती. ती कॅसेटवर रेकॉर्ड करून त्यांना आश्चर्यचकित करून ऐकविणे हा माझा महत्वाचा उद्देश होता. ती रेकॉर्ड होती, गीतकार ग. दि. मा. यांचं गजानन वाटावे यांनी स्वरबद्ध केलेलं 'रघुवीर आज घरी येणार'. मंडळी, त्या संध्याकाळचं ते आनंदमयी वातावरण मी कधीही विसरू शकलो नव्हतो. ते सुधाताईंचं गाणं येथे ऐकावं: https://www.youtube.com/watch?v=kmiswEM47zQ *"जयंत, मुंबईहून आम्ही फक्त जुन्या आठवणी घेऊन आलो आहोत. त्या तुला दाखविणार आहोत."* असं म्हणून सुधाताईंनी दुर्मिळ खजिन्याची एक पिशवी माझ्यासमोर उघडली. आणि मी त्यातील अनमोल रत्नें पाहून थक्कच झालो होतो. त्यामध्ये माधवरावांचे व सुधाताईंचे HMVच्या स्टुडिओतील अनेक दुर्मिळ फोटो होते. माधवरावांनी प्रकशित केलेल्या त्यांच्या आठवणी होत्या. तसेच, लताबाईंच्या हस्ताक्षरातील दोन गाण्यांचे हस्तलिखित होते. आणि त्यामागे माधवरावांनी लिहिले होते, *"हे गाणे लता मंगेशकरांनी गायले असून ते स्वतःच्या अक्षरांनी लिहिले आहे."* मंडळी, त्यावेळी मला शोध लागला होता की, लताबाई गाण्यापूर्वी गीतकाराने लिहिलेले गाणे आधी लिहून घेत असे मग गात होती. HMVच्या स्टुडिओत माधवरांनी रेकॉर्डिंग केलेले ते अप्रतिम गाणं होतं, संगीतकार सी. रामचंद्र यांच्या १९५३ मधील 'झांझर' सिनेमातील लताबाईंचं 'बहारें बेंच डाली' हे गाणं..! या गाण्यातील त्रिवेणी संगम म्हणजे, तालवादक लाला गंगावणे यांनी वाजविलेला उत्कृष्ट तबला, कोंवळ्या आवाजात एका दमात लताने गायलेलं गाणं व अण्णांचं लाजवाब संगीत. हे ऐतिहासिक गाणं आपण येथे ऐकाच:
https://www.youtube.com/watch?v=xpNAsUa2f-E माधवराव सी. रामचंद्र यांची खुप स्तुती करीत होते. वेळेचं बंधन ते कटाक्षाने पाळणारे होते. त्यांचं काम अतिशय चोख व शिस्तबद्ध असे. अण्णांच्या सुरुवातीच्या गाजलेल्या अनेक चित्रपटात लाला गंगावणे यांचा तबला असे. माधवराव सांगत होते, *"लाला गंगावणे हे स्वभावाने अत्यंत साधे व धिप्पाड होते. त्यावेळी त्यांच्या तोडीचा उत्तम तबला व ढोलकीवादक कुणी नव्हता."* इतर अनेक दिग्गज कलाकारांसह सर्वांना जवळून पाहण्याचे व ऐकण्याचे भाग्य आम्हाला लाभले. या समाधानाचं कौतुक माधवराव नेहमी करीत असत. थोडक्यात, आज आपण HMVचे जे-जे श्रवणीय असे दिग्गज कलाकारांचे शास्त्रीय संगीत, सर्व भाषेतील गायकांची गीतं, सिनेसंगीत व कार्यक्रम तबकड्या-ध्वनिफितींवर ऐकत आहोत त्यामागे किंवा त्याचे श्रेय माधवराव माडगावकर यांना आहे. आज त्यांनी घेतलेली दिवस-रात्र-२४/७ अपार मेहनतीचं त्यात प्रतिबिंब दिसतं असं म्हटलं तर ते योग्य ठरेल...






***१) मुंबईच्या फिरोजशाह मेहता रोड वरील HMV studioचे कार्यालय... २) HMV studioत संगीतकार नौशाद 'दुलारी' चित्रपटातील 'सुहानी रात ढल चुकी' हे महमद रफीकडून गाणं रेकॉर्डिंग करतांना...***
***३)*** *माझे संग्राहक मित्र डॉ. प्रकाश जोशी यांनी त्यांच्या घरी:* ***त्यावेळी सिनेसृष्टीत जाणकार संगीतकारांचं ज्यांच्यामुळे पान हालत नव्हतं असे एकमेव सुप्रसिद्ध तबला-ढोलकी वादक लाला गंगावणे व श्रेष्ठ संगीतकार सी. रामचंद्र यांची पहिली पत्नी बेन यांचा सत्कार केला तेव्हा...*** *मित्र डॉ. प्रकाश जोशी यांच्या सौजन्याने.*

एकेठिकाणी मी लाला गंगावणे यांच्याबद्दल वाचलं होतं की, राज कपूरच्या ' आवारा' मधील 'घर आया मेरा परदेसी' या स्वप्नदृश्यातील गाण्यात लाला गंगावणेने जी कमाल केली आहे त्यांचं वर्णन असं होतं, *"क्षणात लालाची ढोलकी सुस्पष्ट मधुर आवाजात बोलायला लागली. त्या वादनात स्त्रीसुलभ नखरा होता, नायिकेची अधीरता होती. हुरहूर होती. लालाच्या वादनावर खुश होऊन राजनी त्यांना कडकडून मिठी मारली होती व शंभर रुपये बक्षीस दिले होते. नर्गिस ही काही नृत्यांगना नाही, पण या गाण्यात लालाच्या ठेक्यावर समरस होऊन मंत्रमुग्ध झाल्यासारखी ती नाचली आहे."* हा एक चमत्कार होता. राज कपूरच्या दिगदर्शनाची कमाल, ते गाणं, ते स्वप्नदृश्य आणि लाला गंगावणेचा तबला-ठोलक येथे ऐका:
https://www.youtube.com/watch?v=ujW8N9bvvCI





***१) 'गंगा जमुना डोळ्यात उभ्या का' या गाण्याच्या रेकॉर्डिंगच्या प्रसंगी. डावीकडून: HMV स्टुडीओत***

***वसंतराव कामेरकर, संगीतकार वसंत प्रभू, लता मंगेशकर, जी. एन. जोशी व माधवराव माडगावकर... २) लता मंगेशकरांचा दुर्मिळ फोटो... ३) डावीकडून: माधवराव, राज कपूरच्या 'बॉबी' फिल्मचा गायक शैलेंद्र सिंग व जी. एन. जोशी...***




***१) जेथे माधवराव रहात होते त्या सोसायटीची दोन बिल्डींग्स होती. एक होतं माधवरावांचं 'दत्त निवास' व मागे 'शांती कुंज'. तेथे संगीतकार बुलो सी. रानी रहात होते... २) माधवराव जेथे पहिल्या मजल्यावर रहात होते ते 'दत्त निवास'. त्या रस्त्याचं नांव कॅमेरामन पांडुरंग नाईक आहे. (पूर्वीचा शिवाजी पार्क रस्ता नं. ५)...*** *माझा मित्र नरेन/नंदू गुप्ते याच्या सौजन्याने...* ***३)*** *HMV स्टुडिओत. डावीकडून:* ***माधवराव, मन्ना डे, श्रीनिवास खळे व जी. एन. जोशी...***

माधवराव ज्या बिल्डिंगमध्ये रहात होते त्या घराचे नांव 'दत्त निवास' होते. त्याच बिलिंगमध्ये वरच्या मजल्यावर जुन्या काळातील सुप्रसिद्ध संगीतकार व कळसूत्री बाहुल्यांचे शिल्पकार 'मधुलाल दामोदर मास्टर' रहात होते. मला आठवतंय अजय व त्याचे जवळपासचे कांही मित्र शाळेत असतांना मधुलाल यांचे सोबत हौशेखातर त्या कळसूत्री बाहुल्यांचे कार्यक्रमही करीत असत. महत्वाचं म्हणजे, राज कपूरच्या 'मेरा नाम जोकर' या सिनेमात मुकेशचं शिवरंजनी रागातील जे 'जाने कहां गये वो दिन' या अप्रतिम गाण्यात जोकरची सांकेतिक/प्रतिमात्मक कळसूत्री बाहुली वापरली आहे ती मधुलाल मास्टर यांनी बनविली होती. सुमारे १९७०/७१ च्या काळात व्ही. शांताराम यांचा 'जल बिन मछली...' व राजकपूरचा 'मेरा नाम जोकर' आर्थिक दृष्ट्या खर्चिक व भव्य सिनेमे प्रकाशित झाले
होते. 'जल बिन मछली...'चे साऊंड इंजिनियर अथवा रेकॉर्डिस्ट होते मंगेश देसाई. आणि त्याचवेळी रेकॉर्डिंग क्षेत्रात एक क्रांती घडली होती. मोनो रेकॉर्डिंग हे इलेकट्रॉनिकपणे स्टिरिओ करण्याचे अत्यंत कठीण व तांत्रिक दृष्ट्या अवघड काम माधवरावांकडे आले होते. त्यावेळी व्ही. शांताराम यांनी मंगेश देसाई यांना माधवरावांची मदत घ्यायला सांगितली होती. आणि माधवरावांनी ती केली होती. तसेच, राज कपूरच्या 'मेरा नाम जोकर'साठीही माधवरावांच्या मदतीने त्या सिनेमाचे प्रभावी

रेकॉर्डिंग इलेकट्रॉनिक पद्धतीने स्टीरिओफोनिक केले होते. आज हा एक चमत्कार समजला जातो. त्याचे पूर्ण श्रेय माधवरांना दिलं जातं..! तेव्हा 'मेरा नाम जोकर' प्रकाशित होण्याआधी त्याची आकर्षक व नाविन्यपूर्ण LP Record घेऊन अजय आमच्या घरी आला होता. त्याच आकर्षण व रेकॉर्डिंग मी विसरू शकत नाही...

तसेच, माधवरावांच्या मागच्या बिल्डिंगमध्ये नामवंत संगीतकार बुलो सी. रानी रहात होते. मी त्यांच्या घरी जाऊन त्यांनाही एकदा भेटलो होतो. सुप्रसिद्ध अभिनेत्री व गायिका सुरैयाच्या 'बिल्वमंगल' या चित्रपटाला बुलो सी. रानी यांचे उत्कृष्ट संगीत होते. त्या व जोगन या सिनेमातील कांही गाणी त्यांनी बाजा पेटीवर वाजवून दाखविली होती. बुलो सी. रानीच्या वरच्या मजल्यावर सिने निर्माते जी. एस. रावलही रहात होते. आणि त्याच परिसरात अभिनेत्री निरुपा रॉय, संगीतकार जयकिशन, गायिका पारो देवी व रूप के शौरी व पत्नी 'लारा लप्पा फेम' मीना शौरी रहात होते. आणि पुढे गेल्यावर अल्ट्रा सोसायटीत लग्नानंतर आशा भोसले रहायला आल्या तेव्हा अजयच्या आई-वडिलांना नियमित भेटायला येत असत. तसेच, शिवाजी पार्कच्या त्यांच्या घरी अनेक नामवंत कलाकार येत असत. तलत मेहमूद, मन्ना डे, विलायत खान व संगीतकार नौशाद यांचा तर वैयक्तिक परिचय होता. त्यामुळे ते नियमित येत असत. जी. एन. जोशी यांनी लिहिल्या 'स्वरगंगेच्या तीरी' या पुस्तकातील बहुतेक माहिती वाचल्यावर आपल्या लक्ष्यात येईल की, त्याचे व माधवरावांचे अनुभव हे सारखेच आहेत. माधवरावांचं बंगाली भाषेवर प्रभुत्व असल्याने सिनेक्षेत्रातील बंगाली व इतर कलाकार हे सर्व बाबतीत माधरावांना त्यांचे गुरु मानीत होते. विशेषतः मन्ना डे, हेमंत कुमार, एस. डी./आर. डी. बर्मन, किशोर कुमार, सलील चौधरी, अनिल बिस्वास वगैरे. कांही बंगाली गायक कलाकरांना माधवराव गातांना बंगाली उच्चार कसे करावेत व त्याचा अर्थ समजवून सांगत. तसेच त्यांना मराठी गातांनाही ते मदत करीत होते. खुद्द लताबाई व आशा भोसलेही त्यात होत्या. थोडक्यात, माधवराव सर्व बाबतीत व क्षेत्रात निष्णात, परोपकारी व निगर्वी होते. हे सर्व अविस्मरणीय होते...

माधवराव त्यांच्या कामात इतके निष्णात, कर्तबगार व परोपकारी स्वभावाचे होते की, HMVमध्ये काम करत असतांना त्यांना दिवस-रात्र काम करावे लागत असे. त्यातून गायक व इतर वादक कलाकार यांचा मूड सांभाळणे सर्वात महाकठीण असे. त्यामुळे ते वेळी यावेळी घरी येत असत. अजय सांगत होता की त्याची व वडिलांची भेट कधी-कधी दोन तीन दिवसांनी होत असे.

मी जेव्हा लताबाईंना भेटलो होतो तेव्हा, त्यांना HMV स्टुडिओ व माडगावकर यांची आठवण दिली होती. आणि त्यांना मी त्यांच्याबद्दल विचारले होते. तेव्हा, लताबाई माडगावकरांबद्दल आदराने बोलत होत्या. म्हणाल्या, *"सुरुवातीला वर उंचावर असलेल्या एकाच माईकवर रेकॉर्डिंग करावे लागत असे. मी उंचीने बुटकी होते. तेव्हा माडगावकरांनी मला एक छोटे स्टूल दिले होते व त्यावर*

*मी उभी राहून गाण्याचे रेकॉर्डिंग करीत असे. त्यांनी मला रेकॉर्डिंगसाठी करावे लागणारे अनेक बारकावे समजावून सांगितले होते. शिवाय, ते अत्यंत शांत स्वभावाचे होते. माझ्यावर त्यांचे फार उपकार आहेत. कृपया माझे त्यांना व सुधाताईंना आठवणीने नमस्कार द्या."* त्यावेळी HMV मध्ये अनेक देशी व परदेशीय नामवंत, दिग्गज व नवोदित कलाकार कामानिमित्ताने व रेकॉर्डिंगसाठी येत असत. कांही जण तर अनुभवी माधवरावांचा सल्ला घेण्यासाठीही येत होते. सर्वांना ते आनंदाने मदत करीत असत. हा त्यांचा गुण वाखाणण्यासारखा होता. मला आठवतंय मी शाळेत असतांना अजयच्या मोठ्या बहिणीचं, डॉ. आशाचं जेव्हा लग्न कॅडेल रोड वरील वनिता समाजच्या मोकळया जागेत झालं तो अविस्मरणीय लग्नसमारंभ मी कधीच विसरू शकणार नाही. अजयचे आई-वडील हे सुप्रसिद्ध व त्यांच्या क्षेत्रात ते नामवंत असल्याने, त्या लग्नसमारंभाला चित्रपट सृष्टीतील, रेकॉर्डिंग व इतर क्षेत्रातील असंख्य कलाकार मंडळी हजर होती. त्या संध्याकाळच्या समारंभ सोहळ्यासाठी येणाऱ्या कलाकारांसंबंधीचं ओळखवजा सूत्रधार होते, सुप्रसिद्ध सिनेनट मनमोहन कृष्ण. 'न भूतो न भविष्यती' असा तो अभूतपूर्व सोहळा होता...
ह्यूस्टनला रहाणारे माझे आणखी एक ज्येष्ठ मित्र होते, परोपकारी दिवाकर उर्फ भाई कारखानीस. त्यांनाही भेटायला मी व अजय गेलो होतो. भाई म्हणजे, रेकॉर्डिंग व व्हिडीओग्राफीतील उत्तम संग्राहक व जोपासक. त्यांच्याकडे असंख्य दुर्मिळ चिजा ऐकायला व पाहायला मिळाल्या. अजयच्या घरी जाऊन त्यांच्या आई-वडिलांची व त्यांच्या आठवणींची व्हिडीओग्राफी करावी अशी







***१) HMV स्टुडिओत: मागे उभे: दुसरे माधवराव, बिटल्स ग्रुपचा प्रसिद्ध गायक जॉर्ज हॅरिसन व सेन गुप्ता... २) रेकॉर्डिंग स्टुडिओत माधवराव... ३) HMV स्टुडिओत: माधवराव, भीमसेन जोशी, जेम्स आयव्हरी, जयकिशन, उषा अय्यर-उत्थुप, शशी कपूर व इस्माईल मर्चंट...***

भाईंची ईच्छा होती. मात्र, कांही कारणास्तव तसं घडलं नाही... दरम्यान, मी सुधाताईंकडील एका स्टुडिओत जाऊन सर्व दुर्मिळ फोटोंच्या कॉपीज करून घेतल्या होत्या. आज त्या घेतल्या म्हणून माझ्याकडे सुरक्षित आहेत. कारण, अजयचे वडील गेल्यावर त्यांच्या इच्छेनुसार सुधाताई मुंबईला

आपल्या मुलीकडे, डॉ. आशाकडे रहायला गेल्या होत्या. जातांना तो सर्व दुर्मिळ खजिना त्या सोबत घेऊन गेल्या होत्या. अजयला माझ्या छंदाचं, लेखणीचा व संग्राहक वृत्तीची पूर्ण कल्पना होती. अजयने माझं उत्तम स्वागत करून मला सर्व प्रकारचं आनंदाने सहकार्य केलं होतं. मी खऱ्या अर्थाने भाग्यवान ठरलो होतो यात शंका नव्हती. हे आजच्या लेखावरून तुम्हाला निश्चित समजेल.
मूळ गोव्याचे माडगाव या गांवातील माडगावकरांचं दैवत दामोदर/शंकर होतं. परंतु, शिक्षण व व्यवसायासाठी बाहेर पडलेले त्यांचे पूर्वज इंग्लंड येथे स्थायिक झाले होते. कालांतराने माधवरावांचे वडिल भारतात येऊन ते बर्मा येथे उद्योगासाठी रेल्वेने जात असतांना त्यांना कांही कलकत्याचे धंदेवाईक मारवाडी भेटले. आणि त्यांनी त्यांना बर्मा येथे न जातां कलकत्याला थांबून व्यवसाय करावा असे सुचविले. त्यासाठी सर्व प्रकारचे सहकार्य व मदत करण्याचे त्यांनी माधवरावांच्या वडिलांना आश्वासन दिले. त्यामुळे ते कलकत्याला स्थायिक झाले.
माधवरावांचा जन्म कलकत्ता येथे झाला होता. त्यांचे शालेय शिक्षण जरी पूर्णपणे बंगाली भाषेतून झाले होते तरीही त्यांच्या आई-वडिलांनी त्यांच्या मराठी भाषेकडे दुर्लक्ष केलं नव्हते. लायब्ररीत जाऊन मराठी कथा-कादंबऱ्या वाचणे याची त्यांना गोडी लागली होती. त्यामुळे मराठी भाषा ते विसरले नव्हते. शालेय शिक्षणानंतर माधवरावांनी बनारस विद्यपीठातून मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल इंजिनियरिंग मधून उच्च शिक्षण घेतले होते. आणि त्या काळात पुढे त्यांनी बंगलोरच्या Indian Institute of Science मध्ये जाऊन इलेक्ट्रॉनिक्समध्ये पी. एच. डी. केलं होतं..!
तेथे त्यांची भौतिकशास्त्रज्ञ व त्या विषयात नोबेल पुरस्कार मिळालेले सुप्रसिद्ध सी. व्ही. रामन यांच्याशी भेट झाली होती. त्यावेळी रामन यांनी माधवरावांना त्यांच्या सोबत कार्य करण्याची ईच्छा दर्शविली होती. आणि याच दरम्यान माधरावांच्या वडीलांचे कलकत्त्यात निधन झाले होते. त्यामुळे माधवरावांना आलेली संधी पूर्ण करतां आली नव्हती. हे दुर्दैव होतं. भावंडात मोठे असल्याने माधवरावांना कलकत्याला परत जावं लागलं होतं. इंजिनियरिंगच्या शिक्षणामुळे त्यांना HMV नोकरी मिळाली. तेथे त्यांनी आपला जम  लवकरच बसविला व त्यांच्या क्षेत्रात त्यांनी उल्लेखनीय कामगिरी केली. विशेषतः साऊंड रेकॉर्डिंगच्या परदेशीय-इंग्लिश यंत्रणेत त्यांच्या अनुभव कंपनीला फायदेशीर ठरला होता. त्यामुळे माधवरावांना अधिक अनुभव घ्यालाल आणि द्यायला कंपनीतर्फे आखाती देशात जावं लागत होतं. तसेच, साऊंड रेकॉर्डिंगची मशीने बिघडली तर त्याचे पार्टस इंग्लंडहून मागवावे लागत. त्यावेळी ते पार्टस बोटीने यायलाच मुळी महिने लागत असत. शिवाय ते खर्चाचेही असत. तेव्हा माधवरावांनी त्या मशीनवर काळजीपूर्वक अभ्यास करून त्याची योग्य दखल कशी घेतली तर ती बिघडली जाणार नाहीत. यावर अधिक भर दिला आणि त्यात ते यशस्वी झाले होते. यामुळे कंपनीचा खर्च वाचत होता. आणि कंपनीचं उत्पादन व फायदा वाढत होता. या कर्तबगारीवर माधवराव लवकरच HMVचे चीफ साऊंड रेकॉर्डिंग इंजिनियर झाले व

निवृत्त होईपर्यंत ते HMVचे खऱ्या अर्थाने एक निस्वार्थी, यशस्वी व विश्वासू 'मास्टर्स' म्हणून आदराने जगले यात शंका नाही.
सुरुवातीला कलकत्त्याला HMVमध्ये कामाला असल्याने माधवरावांचं बंगाली भाषेवर प्रभुत्व होते. पु. ल. देशपांडे हे जेव्हा शांतिनिकेतन येथे कांही वर्षासाठी गेले होते. त्यावेळी ते व माधवराव एकमेकांशी बंगाली भाषेत बोलत असत. पु. ल. मुंबईला आल्यावर त्यांचा व माधवरावांचा बंगाली भाषेतून पत्रव्यवहार होत असे. त्यातील पु. ल. यांनी माधवरावांना लिहिलेले एक खाजगी पत्र मला दाखविले होते. तसेच, माधवरावांच्या व सुधाताईंच्या लग्नालाही पु. ल. हजर होते.





***१) गायक तलत मेहमूद व माधवराव... २) डावीकडून: जी. एन. जोशी, संगीतकार रवी, महमद रफी व तबल्यावर मंगेशकर... ३) संगीतकार सलील चौधरी, विश्वजित व माधवराव...***

माधवराव २००९ मध्ये गेले. त्यावेळी ते ९६ वर्षांचे होते. ते गेल्यावर माझे स्नेही डॉ. सुरेश चांदवणकर यांनी माधवरावांना दिलेल्या आदरांजली लिहिलं होतं, "*१९३७ ते १९७३ या काळात त्यांनी ध्वनिमुद्रण कलेच्या अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत अनेक नामवंतांचे ध्वनिमुद्रण केले. सुरुवातीला कोलकाता येथे के. सी. डे, बेगम अख्तर यांची व अनेक नवोदितांची ध्वनिमुद्रणे केल्यावर ते मुंबईत आले. इथे अनेक संगीतकारांबरोबर त्यांनी काम केले. अवीट गोडीची शेकडो गाणी सुबकपणे मुद्रित करण्यातले त्यांचे योगदान महत्त्वाचे आहे. ७८, ४५ व ३३.३ गतीच्या ध्वनिमुद्रिकांच्या मुद्रण तंत्रात ते पारंगत होते. सुरुवातीच्या काळात जी. एन. जोशी व वसंतराव कामेरकर नवनवीन कलावंतांच्या शोधात असताना माडगावकर स्टुडिओमधली तांत्रिक बाजू समर्थपणे सांभाळत होते. एका मायक्रोफोनवर ध्वनिमुद्रणे करावी लागत. जी. एन. जोशी, गजानन वाटवे, गंगूबाई हनगल, हिराबाई बडोदेकर, माणिक वर्मा यांची अनेक ध्वनिमुद्रणे त्यांनी केली. लता मंगेशकरांची 'गंगा जमुना डोळ्यात उभ्या का' व 'हसले ग बाई हसले' ही गाणी माडगावकरांनी मुद्रित केली. चुंबकफिती (Magnetic Tapes) आल्यावर त्यांच्या एडिटिंगचे तंत्रही त्यांनी आत्मसात केले. त्यांच्या आग्रहावरून अंगात ताप असताना व खोकल्याची उबळ येत असतानाही पं.*

*डी. व्ही. पलुस्करांनी 'श्री' रागाचे २५ मिनिटांचे मुद्रण केले व तेच त्यांचे अखेरचे गायन ठरले. त्यावर ३० तास मेहनत घेऊन १८ मिनिटांची एल. पी. रेकॉर्ड माधवरावांनी सिद्ध केली. ती आजही एडिटिंगचा आदर्श नमुना मानली जाते. आधुनिक तंत्रात त्यांनी कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, किशोरी आमोणकर, सुधीर फडके, शिवकुमार शर्मा, हरिप्रसाद चौरासिया, बिस्मिल्ला खान यांची ध्वनिमुद्रणे केली. निवृत्तीनंतर अनेक वर्षे ते शिवाजी पार्क येथे रोड नं. ५ वर (आता कॅमेरामन*



*ऐतिहासिक क्षण:* ***१) 'मेरा नाम जोकर' या चित्रपटात राजकपूर व कल्पनातीत कहाणीवर आधारित जोकरची लाकडाची अत्यंत संपर्पक बनविलेली कठपुतळी/बाहुली... २-३) ज्यांनी ती कठपुतळी/बाहुली बनविली होती ते जुन्या काळातील नामवंत संगीतकार व शीएवजी पार्कला रहाणारे पपेटियरचे शिल्पकार मधुलाल दामोदर मास्टर... ४) अजयसमवेत मी. अजयच्या ह्यूस्टन, टेक्सास येथेही घरी...***

*पांडुरंग नाईक मार्ग) 'दत्त निवास' येथे राहत होते. तसं पाहिलं तर त्यावेळी शिवाजी पार्क म्हणजे, सर्व क्षेत्रातील कलाकारांचे रहाण्याचे ठिकाण होते. ऐतिहासिक शिवाजी पार्कच्या प्रत्येक गल्लीत कुणी-ना-कुणी नामवंत व्यक्ती रहाणारी होती. अनेक कलावंतांच्या ध्वनिमुद्रणाच्या आठवणी सांगताना ते रंगून जात. कारण, ते सर्व माधवरावांचे परममित्र होते.के. सी. डे यांच्याकडून त्यांनी चक्क दोन गुजराती गाणी गाऊन घेतली होती.*

*कलकत्याला असतांना अंध गायक के. सी. डे यांचं सर्वप्रथम केलेलं यशस्वी रेकॉडिंग, त्यांची शाबासकी व रेकॉर्डिंग स्टुडिओत जाऊन के. सी. डे यांनी माधवरावांचं केलेलं अभिनंदन यामुळे त्यांचा आत्मविश्वास वाढला होता. असं माधवराव अभिमानाने सांगतात. गझलसम्राज्ञी बेगम अख्तर यांना कंपनीच्या एका मार्केटिंगच्या अधिकाऱ्याने 'कव्वाली' मुद्रित करायची सूचनावजा आज्ञा करताच त्या संतापल्या. त्यांचा राग माडगावकरांनीच गोड बोलून घालवला. बिस्मिल्ला खान यांची विमान प्रवासाची भीती घालवून त्यांना परदेशात कार्यक्रमास जायलाही त्यांनी तयार केले. कुठल्याही संस्थेच्या उभारणीत सर्वस्व वाहून काम करणारी माणसे आवश्यक असतात. माधवराव माडगावकर अशांपैकी एक होते. रसिक श्रोता एक गोष्ट मात्र कधीच विसरू शकणार नाही. ती*

*म्हणजे, आपल्या खडतर आयुष्यात विसाव्याची जागा दाखविणाऱ्या HMVच्या मास्टर्सनी आपणां सर्वांना दिलेले व दीर्घकाळ टिकणारे अंमल असे आनंदाचे क्षण. पुढे मागे जर HMVचे म्युझियम अथवा संग्रहालय निर्माण झाले तर त्याच्या इतिहासात ध्वनिमुद्रणातील एकमेव दीपस्तंभ माधवराव माडगावकर यांचं योगदान सुवर्ण अक्षरात लिहिले जाईल..!*
*थोडक्यात,* ***माधवराव हे ध्वनिमुद्रणातील दीपस्तंभ होते..!"***
*आपला,*
**जयंत.**

**ता. क:** या लेखासाठी मला माझा मित्र अजय माडगावकर आणि त्याच्या तीर्थरूप आई-वडिलांची झालेली मदत व सहकार्य लाख मोलाचे होते. यांच्याशिवाय मी हा लेख पूर्ण करूं शकलो नसतो. तसेच, माझे स्नेही डॉ. सुरेश चांदवणकर व नरेन/गुप्ते यांनीही वेळोवेळी केलेली मदत तितकीच महत्वाची होती. या सर्वांचा मी अत्यंत ऋणी व आभारी आहे. धन्यवाद.

---

This is from my good friend Ajay Madgavkar

Jayu,
I found this summary of my father's career in old document. You may wish to use whatever necessary from it. This also specifies some dates etc.
Rgds,
Ajay.

**M. A. Madgavkar, Chief Recording Engineer, HMV (1937-1973)**

Madhav Anandrao Madgavkar was the Chief Recording Engineer of HMV over a long career span of 37 years. He was trained as a mechanical and electrical engineer, and was in the process of studying for a Ph. D. in Electronics at the Indian Institute of Science, Bangalore, when the untimely death of his father in 1937 at a young age necessitated a change in the course of Madhav's academic aspirations in order to support his family. He was hired by HMV, which resulted in his true calling, namely his passion for perfecting the art of reproducing sound for the enjoyment of

the listeners as well as developing life-long personal relationships with many artists he had the privilege to collaborate while recording their voices or instruments.

His many credits include recording most of the old Hindi film songs from the 1940's till 1957 (Mother India being the last film) including many hit movies such as Barsaat, Awara, Andaz, Nagin, etc. He also recorded all the well-known artists during the era 1940-1970 such as Begum Akhtar, K. C. Dey, Lata Mangeshkar, Ravi Shankar, Bhimsen Joshi, Bismillah Khan and Jagjit Singh to name a few. In 1971, in an experiment of historical significance, he collaborated with fellow recordist Mangesh Desai to simulate stereophonic sound on HMV sound track for V. Shantaram's movie "Jal Bin Machhli, Nrutya Bin Bijali". This was the first Indian film for which all songs were recorded in stereophonic sound. The film however had mono soundtrack. He also recorded George Harrison's music track for the movie "Wonderwall" in 1968 when the Beatles came to India to record.

---



*१) पु. ल. देशपांडे... २) सुधाताई व माधवराव...*

**Below is personal letter written by PL Deshpande to Madhavrao...**

1 Roopali
777 Shivajinagar
Poona 411004

বন্ধুবর মাধববাবুকে আমার হার্দিক প্রণাম।

আপনার লেখা চিঠিটা পেয়ে খুবই খুশি হলাম। বহু দিন ধরে আপনার সঙ্গে গল্পটল্প করবার ইচ্ছে করছিলাম। আমি আগেই শুনছিলাম যে আপনি এইচ.এম.টি. ছেড়ে দিয়ে এখন নতুন একটি কোম্পানীতে সুপ্রতিষ্ঠিত হয়ে আছেন। এইচ.এম.টি.কে তো আপনি যাকে সর্বস্ব সমর্পণ বলা যায় এরকম যোগদান দিয়ে ছিলেন। সেটা শুধু আপনার চাকরীর খাতিরে ছিলনা। সেটা আপনার কর্মনিষ্ঠা। আমার মনে হয় এরকম কাজের স্থানের প্রতি নিষ্ঠা এবং সমর্পণের ভাব রেখে থাকবার যুগ শেষ হচ্ছে। নতুন যুগের সেবাধর্ম শুধু টাকার সঙ্গে যাবার ব্যাপার হয়ে গেছে। নতুন স্থানে আপনি আপনার ইচ্ছার মতন কাজ করতে পারবেন এই আমার আশা। আমি নিশ্চয়ই আপনার সাইটে দেখতে আসব। নিমন্ত্রণের জন্য ধন্যবাদ।

দয়া করে সুধাদেবীকে আমার বিনম্র প্রণাম নিবেদন করুন। ইতি

শুভার্থি
বী. এল.

**Below is the transation in English of above PL's Bengali letter. Thanx to my good friend Naren/Nandu Gupte for the same...**

**From:** narendra gupte <popendu@yahoo.co.in>
**Subject:** Fw: Translation
**Date:** March 14, 2012 12:30:18 AM EDT
**To:** jvkny1@gmail.com

---

Hi Jayant,

There was some confusion of sending mail to my brother in law who was supposed to translate PL Letter in english. Lateron finally after he sent the translation I sent it from other e mail id which perhaps has not gone.

Any way, I am forwarding the translation that I received.

Sorry for tremendous delay from my side.

Regards,
Naren

--- On **Sun, 5/2/12, Sucharita Pradhan *<charu_p@rediffmail.com>*** wrote:

> From: Sucharita Pradhan <charu_p@rediffmail.com>
> Subject: Translation
> To: popendu@yahoo.co.in
> Date: Sunday, 5 February, 2012, 10:57 AM
>
> Dear tai and nandu,
>
> nice to talk to you yesterday.
> I had a very hectic 7 days or so, what with the exhibition and programmes associated with it.
> last monday we had a dinner organsied by austrade, which was nice.
> we are now looking forward to our mumbai visit.
> i am giving below the translation of the bengali letter sent by you:
> ---------------------------------------------------------------------------
>
> To my friend Madhavbabu,
> My deep regards,
>
> I am very happy to get your letter. I have been wanting to chat with you for a long time.
>
> I had heard about your leaving H. M. V. and are well established in a new company.
>
> You had given H. M. V. your all, as one would say. It was not just a job for you, it was where you worked with total dedication. I feel that the era of respect and dedication (commitment)for one's work is over. The new work ethic is just a equation with money. Anyway, let that be. I only hope that you will be able to work in the way you want to in this new job.
> I will definitely come to see your new studio. Thank you for inviting me.
>
> Please extend my humble greetings (Pranam) to Sudha Devi.
>
> Yours truely,
>
> P.L.

**लता मंगेशकर यांच्या स्वहस्ताक्षरात दोन गाण्यांचे दाखले…**

1) बहारें बेंच डाली - लता - १९५२ झांझर - राजेंद्र कृष्ण - सी. रामचंद्र

2) जी चाहता है अबतो - लता - १९५२ झांझर - राजेंद्र कृष्ण-सी. रामचंद्र.

श्री

जी चाहता है अबतो दुनियासे रूठ जायें
होंटोंपे आरहीहैं अब मौतकी दुआयें

ओ बेवफा जमाने दिलको लगाके देखा
सब कुछ लुटा के देखा
अपना समझके उनको अपना बनाके देखा
दिलमें बसाके देखा
लेकिन मिली वफाके बदले हमें सजायें

चलते न तीर गमके दिलको न आग लगाते
धोकेमें आ न जाते
ये दिन न देखते हम आँसू न यूं बहाते
दो दिनतो मुस्कराते
~~फिर दिलसे यूं न आती~~ अश्कोंभर घटायें